राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये झालेल्या "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी आपद्ग्रस्तांना विशेष दराने मदत देण्याबाबत व विविध सवलती लागू करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक- सीएलएस २०१९/प्र.क्र.१९१/म-३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१५/प्र.क्र.४०/म-३, दि. १३.०५.२०१५

**प्रस्तावना:-**

राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यातील ३२५ तालुक्यांमधील शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निदर्शनास आले आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदत देण्यासंदर्भात मा. राज्यपाल महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १६.११.२०१९ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार बाधित शेतकऱ्यांना मदत देण्यासंदर्भात शासन आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यांतील ३२५ तालुक्यांमधील शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झाले आहे. सदर आपत्तीमुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झालेल्या आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना खालीलप्रमाणे विशेष दराने मदत व सवलती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**(अ) मदत - शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान**

| बाब | आर्थिक सहाय्याचे दर |
|---|---|
| अ) शेतीपिके | रु.८,०००/- प्रति हे. |
| ब) बहुवार्षिक पिके (फळबागा) | रु.१८,०००/- प्रति हे. |

शेतीपिके/ फळपिकांच्या नुकसानीसाठी २ हेक्टरच्या मर्यादेपर्यंत उपरोक्त मदत अनुज्ञेय राहील.

(ब) **सवलती:-**

उपरोक्त नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित झालेल्या ३४ जिल्हयातील ३२५ तालुक्यांमध्ये खालील सवलती लागू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :

१) जमीन महसुलात सूट

२) शेतीपिकांच्या नुकसान झालेल्या शेतकऱ्यांच्या पाल्यांना शाळा व महाविद्यालयीन परीक्षा शुल्कात माफी.

सदर सवलतींबाबत संबंधित प्रशासकीय विभागाने आवश्यकतेनुसार सविस्तर आदेश निर्गमित करावेत. तसेच त्याबाबत आवश्यक निधीची तरतूद करुन ती माफ करण्यात यावी.

२. शेती व फळ पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार सर्व जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या अहवालानुसार विभागीय आयुक्त यांनी आयुक्त (कृषि) यांना पाठविलेल्या व कृषि आयुक्त यांनी राज्याचा अहवाल एकत्रित करून शासनास सादर करण्यात आलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

iv) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये.

v) शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

vi) सदर निर्णयान्वये शेतकऱ्यांना देण्यात येणारी मदत ही विशेष बाब असल्यामुळे पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

३. उपरोक्त परिच्छेद क्रमांक १ (अ) मध्ये नमूद केल्याप्रमाणे उपरोक्तप्रमाणे बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र-अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे पहिल्या टप्प्यापोटी एकूण रू २०५९३६. ६५ लक्ष (रूपये दोन हजार एकोणसाठ कोटी छत्तीस लक्ष पासष्ट हजार फक्त) इतकी रक्कम मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत,३१ सहाय्यक अनुदाने ( २२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या निधीचे तात्काळ वितरण करण्यात यावे. तसेच अतिरिक्त लागणाऱ्या निधीची मागणी करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९१११९११०००९४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.11.19 11:[illegible]16 +05'30'

( सुभाष उमराणीकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग),

२. विभागीय आयुक्त (सर्व)
३. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९. सह सचिव (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई यांना बीम्स प्रणालीवर निधी वितरित करण्याच्या विनंतीसह अग्रेषित
१०.कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
११.कार्यासन अधिकारी, कार्यासन (१०-अे/१३-अे), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती म-३ कार्यासन

**शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक- सीएलएस २०१९/प्र.क्र.१९१/म-३ ,**
**दिनांक १८ नोव्हेंबर २०१९ चे विवरणपत्र-अ**

| अ.क्र. | जिल्हा | वितरित करण्यात येत असलेला निधी (रू.लाखात) |
|---|---|---|
| १ | ठाणे | ८२०.६८ |
| २ | पालघर | ९७३.०८ |
| ३ | रायगड | ५१७.१४ |
| ४ | रत्नागिरी | ५०१.३६ |
| ५ | सिंधुदुर्ग | ६६५.०९ |
| ६ | नाशिक | १८१५०.८४ |
| ७ | धुळे | ७४८७.२२ |
| ८ | नंदुरबार | ११३.७६ |
| ९ | जळगांव | १७९९८.०१ |
| १० | अहमदनगर | १३५५५.०९ |
| ११ | पुणे | ३९५५.९५ |
| १२ | सोलापूर | ५८१५.१० |
| १३ | सातारा | १७५७.५७ |
| १४ | सांगली | ३४४८.४२ |
| १५ | कोल्हापूर | ३८.६५ |
| १६ | औरंगाबाद | १२१८१.०९ |
| १७ | जालना | ११०२१.९९ |
| १८ | बीड | १४४१८.८३ |
| १९ | लातूर | १००६८.०२ |
| २० | उस्मानाबाद | ७८१९.५८ |
| २१ | नांदेड | १२३१४.२३ |
| २२ | परभणी | ८७६२.७३ |
| २३ | हिंगोली | ५३७६.६१ |
| २४ | बुलडाणा | १३६१३.९१ |
| २५ | अकोला | ७२५५.७७ |
| २६ | वाशिम | ५६५१.२० |
| २७ | अमरावती | ७२४०.९३ |
| २८ | यवतमाळ | १०१९६.३३ |
| २९ | वर्धा | ४०.२५ |
| ३० | नागपूर | १३३६.९३ |
| ३१ | भंडारा | २८७.८० |
| ३२ | गोंदिया | २६६.०७ |
| ३३ | चंद्रपूर | १९४५.७५ |
| ३४ | गडचिरोली | ३४०.६७ |
| **एकूण राज्य** | | २०५९३६.६५ |